विदर्भ व मराठवाडा विभागात दूध उत्पादन वाढीसाठी राबवावयाच्या विशेष प्रकल्प उभारणीबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१६/प्र.क्र.२७/पदुम ८**

मंत्रालय, मुंबई ४०००३२

तारीख: २१ जानेवारी, २०१७

वाचा -

१.शासन निर्णय समक्रमांकित दि.१७ ऑक्टोबर २०१६

२.महसुल व वन विभाग आदेश क्र.डीपीटी-२०१६/०९/प्र.क्र.१८३/ई-१,दि.२३.११.२०१६

३.राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाचे पत्र क्र.विदर्भ मराठवाडा/३६४, दि. २३ डिसेंबर २०१६

**शासन निर्णय :**

शासनाने संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विदर्भ व मराठवाडा विभागात दुध उत्पादन वाढीसाठी राबवावयाच्या विशेष प्रकल्प उभारणी संदर्भात राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाने सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालानुसार प्रकल्प अमंलबजावणी व त्याबाबतची रुपरेषा स्पष्ट केली आहे. सदर प्रकल्पासंदर्भात दि.१४ डिसेंबर २०१६ रोजी नागपुर येथील हिवाळी अधिवेशनादरम्यान राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाने आयोजित केलेल्या बैठकीत विस्तृत स्वरुपात चर्चा करण्यात आली. सदर चर्चेत राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाच्या अधिका-यांनी असे स्पष्ट केले की, मराठवाडा व विदर्भ विभागात ज्या १० जिल्हयांमध्ये सदर प्रकल्प कार्यान्वित करावयाचा आहे त्या १० जिल्हयांपैकी यवतमाळ जिल्हयात यापूर्वीच अमुलमार्फत दूग्ध नियोजनाचे कार्य सुरु असल्याने सदर जिल्हा या प्रकल्पातुन वगळण्यात येवुन यवतमाळ ऐवजी चंद्रपुर या जिल्हयाचा समावेश करण्यात यावा. याव्यतिरिक्त विविध मुद्यांबाबत चर्चा होऊन सदर चर्चेच्या अनुषंगाने सदर प्रकल्पासाठी पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

१. यापुर्वी संदर्भादिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विदर्भ व मराठवाडा या प्रकल्पामध्ये अकोला, अमरावती, बुलढाणा,वर्धा,नागपुर, यवतमाळ, लातुर, नांदेड,जालना व उस्मानाबाद अशा १० जिल्हयांचा जिल्हयांचा समावेश करण्यात आला होता. मात्र “यवतमाळ” जिल्हयात “अमुल” या सहकारी दुध संघाने यापूर्वीच कार्य सुरु केले असल्याने यवतमाळ जिल्हयाचा समावेश या प्रकल्पात करण्यात येऊ नये असे संदर्भ क्र ३ येथील पत्रान्वये राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाने कळविल्यानुसार “यवतमाळ” ऐवजी “चंद्रपुर” या जिल्हयाचा समावेश करण्यात येत आहे. सदर प्रकल्प सन २०१७ ते सन २०२० या कालावधीत राबविला जाणार आहे.

२. विदर्भ व मराठवाडा प्रकल्पाकरिता महसुल व वन विभागाच्या संदर्भ क्र.२ अन्वये “प्रकल्प संचालक” म्हणून नियूक्त करण्यात आलेले श्री.रविद्र ठाकरे,अध्यक्ष, जात पडताळणी समिती, अमरावती यांची नियुक्ती या विभागाकडुन पक्की करण्यात येत आहे. तसेच श्री.रविंद्र ठाकरे हे प्रकल्प पुर्ण होणाच्या कालावधीपर्यंत त्याच पदावर राहतील व त्यांची तेथुन बदली होणार नाही यासाठी महसुल व वन विभागाकडे स्वतंत्रपणे या विभागाकडून विनंती करण्यात येईल. श्री.ठाकरे यांच्या मदतीकरिता

त्यांच्या विनंतीनुसार लेखाधिकारी व इतर सहाय्यक कर्मचारी आयुक्त पशुसंवर्धन व आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन द्यावेत.

३. संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयात नमुद करण्यात आलयानुसार विदर्भ व मराठवाडा विभागात विशेष दुध उत्पादन प्रकल्पाकरिता पुढीलप्रमाणे “प्रकल्प व्यवस्थापन समिती” स्थापन करण्यात येत आहे.

१) प्रधान सचिव (कृषि) -- अध्यक्ष
२) सचिव (पदुम) -- सदस्य
३) वरिष्ठ व्यवस्थापक, राष्ट्रीय दुग्धविकास मंडळ, गोरेगांव -- सदस्य
४) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य -- सदस्य
५) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य -- सदस्य
६) श्री. संग्राम चौधरी, कार्यकारी संचालक, NDDB ,आणंद -- सदस्य
७) श्री.मौलेश नरेंद्र बुच, विभागीय प्रमुख ( WR) NDDB मुंबई -- सदस्य
८) श्री.सिवा नागराजन ,एम.डी,मदर डेअरी फ्रूट ॲण्ड व्हेजि.लि. नोएडा -- सदस्य
९) श्री.श्रीराम सिंग , सराव प्रमुख, राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ, नवी दिल्ली -- सदस्य
१०) प्रकल्प संचालक -- सदस्य सचिव

४. प्रकल्प संचालक तसेच प्रकल्प व्यवस्थापन समिती यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या जून २०१६ मध्ये राष्ट्रीय दुग्धविकास मंडळाने शासनास सादर केलेल्या सविस्तर प्रकल्प अहवालातील अनुक्रमे परिच्छेद क्र. १२.१ व १२.३ नुसार राहतील.

५. “प्रकल्प संचालक” प्रकल्प व्यवस्थापन समितीच्या मान्यतेने एका स्वतंत्र सनदी लेखापालाची (CA) नियुक्ती करतील. सदर सनदी लेखापाल प्रकल्पाचे लेखापरिक्षण करुन वार्षिक अहवाल प्रकल्प व्यवस्थापन समितीस सादर करतील. प्रकल्प संचालकाचे कार्यालय शासकीय दुग्धशाळा,नागपुर येथील मदर डेअरी ॲण्ड व्हेजिटेबल लि. या कंपनीस हस्तांतरीत करण्यात आलेल्या जागेवर राहील.

६. सदर प्रकल्पाकरिता स्वतंत्र खाते उघडण्यात येवुन सदर खाते प्रकल्प संचालकामार्फत कार्यान्वीत करण्यात येईल. सदर खात्यामध्ये प्रकल्प व्यवस्थापन समितीमार्फत तयार करण्यात आलेल्या वार्षिक कृति आराखडा व सहभाग घेणा-या संस्थांमार्फत प्राप्त होणा-या प्रकल्पानुसार उपलब्ध करुन देण्यात येणारा निधि जमा करण्यात येईल व त्याचा विनियोग सदर खात्याद्वारे करण्यात येईल.

७. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत अनुदान प्राप्तीसाठी राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाने सुधारित सविस्तर प्रकल्प (DPR) अहवाल राज्य शासनास तात्काळ सादर करावा.

८. उत्पादन वृध्दीवाढ कार्यक्रम उदा. कृत्रिम रेतनाच्या सुविधा घरपोच पुरविणे, संतुलित पशूखाद्य पुरवठा, पशुखाद्य विकास कार्यक्रम, जनावरांचे वाटप, गावपातळीवर पशुचिकित्सालय सेवा इत्यादी बाबी प्रकल्प संचालकामार्फत राबविण्यात येतील.

९. संस्थात्मक उभारणी कार्यक्रम उदा. गाव पातळीवरील दुध उत्पादक संघटन, दुध उत्पादकांच्या अतिरिक्त दुधाचे संकलन, दुध उत्पादकांमध्ये जागरुकता व मनुष्यबळ प्रशिक्षण इत्यादी बाबी राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ व त्यांच्या उपकंपन्यांमार्फत राबविण्यात येईल.

१०. प्रकल्प समन्वय व सनियंत्रण पथक नियुक्ती व तत्संबधित कार्यवाही राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळाकडुन करण्यात येईल

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१२११६४६४२८१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Vasantrao Gurav

Digitally signed by Ravindra Vasantrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9dfb7aefbd9e82b129c324d567b46e1d853d93c38d6e222c868eac72ecd12784, cn=Ravindra Vasantrao Gurav
Date: 2017.01.21 16:48:33 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
५) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग
६) सचिव (पदुम), कृषी व पदुम विभाग
७) आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास,महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
९) महाव्यवस्थापक, राष्ट्रीय दुग्धविकास मंडळ,पश्चिम द्रुतगती महामार्ग, गोरेगाव (पू.) मुंबई
१०) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी दुध संघ (महानंद) गोरेगाव (पू.) मुंबई
११) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,नागपूर विभाग, नागपूर
१२) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
१३) निवड नस्ती